सच्चिदानंद व गोविंद रेड्डी यांचा खून झाल्याची बातमी ‘साधने’तून वाचली होती. गोविंद रेड्डींना मी ओळखत होतो. सच्चिदानंदांविषयी ओरिसात काम करीत असताना सहकाऱ्यांकडून ऐकले होते. खुनाची बातमी वाचून हळहळ वाटली, पण एक सामाजिक समस्या म्हणून या घटनेचा विचार केला नव्हता, हे कबूल केले पाहिले. 'माणूस' साप्ताहिकाचे संपादक श्री. श्री.ग. माजगांवकर यांनी यावर एक विशेषांक काढला आणि काही प्रश्न उपस्थित केले.

ज्या कार्याचा परिणाम प्रस्थापितांच्या सत्तेला सुरुंग लावण्यात होतो असे कार्य एका मर्यादेपलीकडे आपखुशीने सहन केले जात नाही. संरक्षक अशी कवचकुंडले आवश्यक असतात. अशी कोणतीच संरक्षक रचना नसतानाही क्रांतिकारक काम होऊन जाते हे खरे असे पुष्कळदा वाटते. पण वस्तुत: कोणत्या ना कोणत्या प्रकारचे संरक्षण आवश्यक आहेच. समाजव्यवस्था अतिशयय विस्कळीत झालेली असेल, वा भ्रष्टाचारामुळे गलथान बनलेली असेल, किंवा विलासामुळे जड बनली असेल तर, ह्या विस्कळितपणाचेच, गलथानपणाचेच, जडत्वाचेच संरक्षक कवच तयार होते. काही वेळ क्रांतिकारकाच्या कार्याची परिणामकारकता अ-दृश्य असल्याने दुर्लक्ष केले जाते, व या दुर्लक्षाचाच फायदा उठवता येतो, तेच संरक्षण ठरते.

भारतातली आजची परिस्थिती पहाता, ज्यांच्या हाती सामाजिक, आर्थिक व राजकीय सत्ता आहे ते वर्ग आपल्या हातातली सत्ता टिकवून धरण्याच्या बाबतीत, तीत वाढ करण्याच्या बाबतीत पुरेसे जागरूक आहेत. त्यांच्या ठिकाणी नव्याने सत्ता हाती घेणाऱ्या वर्गाच्या ठिकाणी आढळणारा जोम आहे. कारण त्यांना नव्यानेच आर्थिक-राजकीय सत्ता प्राप्त झाली आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात पददलितांच्या बाजूने उभे राहून समाजपरिवर्तन घडवून आणण्याची आकांक्षा बाळगणाऱ्यांनी आपल्या दौर्बल्याचे पुरते भान आहे असे आढळत नाही. ज्या दलितांसाठी ते कार्य करू इच्छितात, त्यांचाही पाठिंबा त्यांना नाही. यातून निर्माण होणारे दौर्बल्य भयानक असते. गरीबांना गरिबी दूर व्हायला हवी असते, ती सर्वांची नाही, त्यांची. फार तर स्वजातीय इतरांची. एक नवाच समाज त्यांना हवा नसतो. वर, बहुतेक वेळा, आपला स्वार्थदेखील इतरांच्या प्रयत्नांनी साधला जावा, जाईल अशी त्यांची आशा व अपेक्षा असते. फार तर एखादी तात्कालिक कृती करण्याइतपत त्यांची तयारी असते. संप, हरताळ, आंदोलन, इत्यादी. पण दीर्घकाळ, सातत्याने झीज सोसून काही करण्याइतकी त्यांची उभारी असत नाही, हे कटू पण विदारक सत्य आहे.

सच्चिदानंदांचाही अनुभव काही वेगळा नव्हता. असता तर त्यांचा खून असा वाया गेला नसता. माजगांवकरांनी त्यांच्या कार्याचे जे वर्णन लिहिले आहे त्यावरूनहीं, लोक त्यांना चाहत होते एवढेच दिसते. लोकशक्ती उभी करण्यात त्यांना यश आले होते असे दिसत नाही.

विधायकता आणि संघर्षसिद्धता यांचा मेळ कसा घालायचा या प्रश्नासंबंधीही सच्चिदानंदांनी नीट विचार केल होता का? प्रस्थापितांशी बेडर निर्भयतेने टकरा घेण्यात पुरुषार्थ आहे, पण शहाणपण आहेच आहे नाही. भ्याडाला अहिंसेपेकी हिंसा अधिक श्रेयस्कर, त्याचप्रमाणे, 'शहाण्या' निष्क्रियतेपेक्षा ही झुंज श्रेयस्कर यात वाद नाही. पण सच्चिदानंदांविषयी पूर्ण आदर बाळगून, तरीही त्यांच्या भूमिकेविषयी व कार्याविषयी चिकित्सक दृष्टिकोन बाळगणे आवश्यक आहे. आणि विधायकता आणि संघर्षसिद्धता यांचा मेळ घालता येण्यासाठी त्याची नितांत गरज आहे.

आपल्या एकट्याच्या जोरावर आपण समाज इकडचा तिकडे करून टाकू ह्या सूक्ष्म अहंकारापासून कार्यकत्याने स्वतःस मुक्त ठेवण्याची फार गरज असते. गांधींसारख्या महामानवालाही हे साध्य झाले नाही. आपल्या बलिदानानेही ते केवळ या देशातले मुसलमानांचे शिरकाण थांबवू शकले पण उभय जमातींमध्ये मिलाफ घडवून आणू शकले नाहीत, एकट्याने लढत देण्याची कल्पना रोमहर्षक आहे व हौतात्म्याचे मनुष्यसुलभ आकर्षणही माणसाला, विशेषत: क्रांतिकारकाला त्या मार्गाकडे आकृष्ट करीत असते.

कोणी दलितच उरणार नाहीत अशा एका समाजाच्या निर्मितीसाठी लढा द्यावा लागेल हे येथे गृहीत धरलेले आहे. पण हा लढा - मग तो स्थानिक पातळीवर असो की राष्ट्रीय – देण्यापूर्वी किमान शक्ती उभी करण्याची गरज फक्त आपण आवश्यक मानत आहोत.

या शक्तिसंवर्धनासाठी विधायक कार्य आवश्यक आहे याविषयी आपले एकमत असले तर, काही काळ तरी अशी, पूर्वतयारीच्या स्वरूपाची शक्ती निर्माण करण्यावर भर देऊन, आवाक्याबाहेरचा संघर्ष टाळण्याचे पथ्य कडकपणे पाळले पाहिजे. संघर्षाच्या पाठीमागे धावता कामा नये. संघर्ष टळेल अशा पद्धतीने कार्य करण्याच्या प्रवृत्तीतून विधायक कार्य निःसत्त्व बनले आहे तेवढेच.

संघर्षाची हाव धरल्याने नवसमाजनिर्मितीचे बरेचसे राजकारणही शक्तिक्षयाला कारणीभूत झाले आहे हे विसरता कामा नये. विधायक कार्य करणारी संस्था उभी करावयाची तर प्रस्थापिताशी उभा दावा करता येथे नाही हाही जुनाच अनुभव. काही जण मग विधायक कार्याचा पसारा वाढविण्यातच स्वतःची मर्यादा मानतात. ज्यांना क्रांतीची आच असते, किंबहुना, पुष्कळदा, आपल्याला क्रांतीची आच आहे असे ज्यांना स्वतः विषयी वाटते ते अशा मंडळींना नावे ठेवतात. एका रंगाचे प्रस्थापित जाऊन त्यांच्या जागी नव्या रंगाचे प्रस्थापित आले एवढाच समाजपरिवर्तनाचा अर्थ ठरायचा नसेल तर नव्या समाजव्यवस्थेस अनुरूप अशा संस्था जोपासणे आवश्यक आहे. तेव्हा आजच्या प्रस्थापित समाजव्यवस्थेच्या पोटातच अशा नव्या संस्था जोपासण्याचे काम आपण करावयाचे आहे. कोणी बंधन मानून घेतले तर त्याचा निर्णय समजून घेतला जाण्याची आवश्यकता आहे. ही सहिष्णुता, हा विवेक 'क्रांतिकारकां'कडून बहुधा दाखविला जात नाही.

विधायक संस्थेचे रूपांतर वैयक्तिक स्वरूपाच्या संस्थानात होते, विधायक संस्थेच्या कार्यात प्रस्थापित समाजव्यवस्थेतील गैरप्रकार घडू लागतात तेव्हा अशा विधायक संस्था या प्रस्थापित समाजव्यवस्थेचाच एक भाग बनतात. अशा संस्थांच्या चालकांविषयी आपला आक्षेप, त्यांनी विधायक कार्य ही आपली मर्यादा मानली आहे हा नसावा तर, प्रस्थापित व्यवस्थेतील सर्व वैशिष्ट्ये अंगी वागविणारे ते कार्य आहे व म्हणून ते आपल्या अर्थाने विधायक कार्यच नाही, हा असायला हवा.

येथेच, दुसराही एक मुद्दा मांडला पाहिजे. काही प्रकारचे संघर्षात्मक कार्य, हे देखील नवसमाजनिर्मितीच्या दृष्टीने निरुपयोगी ठरते, तेही प्रस्थापित व्यवस्थेचाच एक भाग असते, हे पुष्कळदा लक्षात येत नाही. पुष्कळदा संप, मोर्चे, हरताळ, व्यक्तींच्या भानगडी उजेडात आणणे, इ. प्रकारले संघर्षात्मक कार्य असलेल्या व्यवस्थेवर मूलभूत प्रहार करीत नाही, तसेच, या कार्याच्या पद्धती व ते कार्य करणारी पुढारी मंडळी यांच्यात संस्थाने बनलेल्या विधायक संस्थांच्या चालकांत व त्यांच्या कार्यात आढळणारे सर्व गैरप्रकार आढळतात.

तेव्हा विधायक कार्य व संघर्ष हे दोन्ही शब्दप्रयोग तसे सारखेच फसवे. ते फसवे ठरावयाचे नसतील तर, विधायक कार्य असो की संघर्ष असो त्याने नव्या समाजाच्या निर्मितीला काय हातभार लागतो आहे याचे उत्तर नेमकेपणाने देता आले पाहिजे.

कोणत्याही कृतीने असा हातभार लागतो असे केव्हा म्हणता येईल? नवा समाज निर्माण करणे म्हणजे अखेरीस माणसांचे वळण बदलणे : मूल्यपरिवर्तन, जाणीवपरिवर्तन, वृत्ती व वर्तन यात परिवर्तन घडवून आणणे ही एक दिशा. दुसरी, ज्या रचनेत, संस्थांत ते सामान्यपणे आपले जीवन घालवितात ती रचना व त्या संस्था नव्या घडविणे.

सच्चिदानंदांच्या कार्याबद्दल माजगांवकरांनी विस्ताराने लिहिले आहे. पण त्यांनाही, 'व्यक्तित्व विकासासाठी केंद्राकडे कुणी फारसे फिरकले नाही... लोक स्तिमित व्हायचे, श्रद्धा, आदर बाळगून असायचे. पण जवळ जाऊन सावलीला उभे रहावेसे काही कुणाला वाटले नाही' या शब्दांतच स्वतःच्या मनावर उमटलेला ठसा व्यक्त करावासा वाटला, ही एक अत्यंत बोलकी गोष्ट आहे.

माजगांवकरांनी त्यांच्या लेखनाबद्दल लिहिले आहे त्यावरूनही, भ्रष्टाचार उजेडात आणल्यावर, आपल्या तिखट व धारदार लेखणीने भ्रष्टाचारी व्यक्तींचे वाभाडे काढण्यावर त्यांचा भर होता असे दिसते. असे करायला आज मोठे साहस लागते, प्राण तळहातावर घ्यावा लागतो, तसा तो सच्चिदानंदांनी घेतला व गमावलाही हे सर्व निर्विवाद. आणि तरीही थंड डोक्याने आपण प्रश्न विचारला पाहिजे की, 'त्यांच्या कार्याने लोकांचे वळण बदलले काय?' म्हणजे, उदाहरणार्थ, सच्चिदानंद एक पैची लाच द्यायला तयार नव्हते. त्यांच्या कार्याने त्यांच्यासारखी भूमिका घेणारी माणसे कितीएक निर्माण झाली? असे अनेक प्रश्न विचारावे लागतील. जे काम लोकांनी करावयास हवे ते काम आपल्या एकट्याच्या खांद्यावर येऊ पहाणे, सर्वांच्या वतीने व सर्वांच्या साठी आपला स्वतःचा बळी देणे याने तो माणूस महात्मा होऊन जातो. पण नवीन समाज निर्माण करण्याचे काम फारसे पुढे सरकत नाही. सगळा भार आपल्या शिरावर घेण्याचा प्रयत्न हाही म्हणून चुकीचा मार्ग आहे. संघर्ष करीत असतानाही, आपल्याबरोबर येण्यास आपण पुरेशा संख्येने लोकांना तयार करू शकलो आहे की नाही हे पहाणे महत्त्वाचे मानले पाहिजे.

आपल्या समाजातील आजच्या स्थितीचा विचार करता काही वैशिष्ट्ये लक्षात येतात (१) प्रस्थापितांची पकड घट्ट आहे; जागरूक आहे. (२) प्रस्थापित समाजव्यवस्थेत जें सत्ताधीश आहेत आणि जे पददलित आहेत त्या दोघांनाही नव्या समाजरचनेविषयीची ओढ तेवढीच कमी आहे. (३) जो तो आपली आर्थिक स्थिती सुधारण्याच्या प्रयत्नात गर्क आहे व इतरांचे भान राखण्याची त्याची इच्छा तरी नाही किंवा त्याला फुरसत तरी नाही. (४) अगदी तळचे जे थर आहेत त्यांच्या ठिकाणी प्रस्थापिताच्या विरोधी ठामपणे उभे राहण्याची इच्छा तीव्र आहे असे आढळत नाही; आणि असा ठाम विरोध करण्याची त्यांच्यात ताकदही नाही, (५) देशात जो

असंतोष धुमसताना दिसतो त्याचे लक्ष्य 'प्रस्थापित समाजव्यवस्था' नाही तर आपल्यावरील विशिष्ट अन्याय दूर करणे असे त्या असंतोषाचे लक्ष्य आहे.
जेथे जेथे असा असंतोष तीव्रपणे धुमसत आहे तेथे त्या असंतोषाच्या लाटेवर आरूढ होऊन प्रस्थापित समाजव्यवस्था उखडून टाकण्याचा प्रयत्न करणे हा एक मार्ग आहे. नक्षलवादी हा मार्ग अनुसरत आहेत असे म्हणता येईल. त्यांना यश आले आणि एखाद्या प्रदेशात त्यांच्या हाती सत्ता आली तरी नवसमाजनिर्मितीचे कार्य करण्याचे सर्वच्या सर्व उरलेलेच असेल, व हाती सत्ता आहे म्हणून ते फार सोपे जाईल असेही नाही. (रशिया, चीन, क्यूबा, इत्यादी देशांचा अनुभव पहावा.) पण या मार्गात विधायककार्य व संघर्षसिद्धता यांचा मेळ घालण्याचा विचारच नाही. आधीच सार्वत्रिक पसरलेल्या तीव्र असंतोषाचा आपल्या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी वापर करण्याचा तेवढा तेथे संबंध आहे. परिस्थिती जेव्हा व जेथे अशी तप्त असेल तेथे व तेव्हा अशा असंतोषाच्या आवाक्यातील लढे उभारण्याच्या मार्गाचा वापर गांधीनी केलेला आढळतोच. पण अशा लढ्यांचे फलित तात्कालिक व मर्यादित स्वरूपाचे असते हे आपण स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासाच्या काळातही पाहिले आहेच.